



**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग, मंत्रालय मुख्य इमारत, पहिला मजला,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**

दूरध्वनी क्र.०२२-२२०४८२४७ Email ID : deskkh2-rfd@mah.gov.in

---

क्रमांक : गौखनि -४२/०८१९/प्र.क्र.१२८/ख-२ दिनांक : २४ नोव्हेंबर, २०२१

**विषय : गौण खनिज-नांदेड**
**मौजे बरबडावाडी, ता. नायगांव या वाळूगटाची जप्त केलेली लिलावाची रक्कम परत करण्याबाबत.**
**- श्री. गंगाधर दिगांबर बडुरे.**

**शासन ज्ञापन:**

जिल्हाधिकारी, नांदेड यांना त्याचे पत्र क्रमांक जा.क्र.२०१८/मशाका.२/गौख/प्र.क्र.२५, दि.२०.०१.२०२० रोजीच्या उपरोक्त विषयावरील पत्रांस अनुलक्षून असे कळविण्यात येते की, सन २०१७-१८ या वर्षाकरीता नांदेड जिल्ह्यातील रेतीघाटांच्या लिलावातील मौजे बरबडावाडी, ता. नायगाव या वाळूगटाच्या लिलावात भाग घेण्यासाठी लिलावधारक श्री. गंगाधर दिगांबर बडुरे यांनी इसारा रक्कम रू.४,००,५२१/- शासनजमा केली. सदर लिलावात बरबडावाडी, ता. नायगाव, जि. नांदेड हा वाळूगट श्री. गंगाधर दिगांबर बडुरे यांना रक्कम रू.२१,७२,०८४/- इतक्या सर्वोच्च रकमेस अंतिम करण्यात आला. जिल्हाधिकारी, नांदेड यांनी लिलावधारकास लिलावाच्या उर्वरीत रक्कमा शासनजमा करण्याबाबत कळविण्यात आले.

तथापि, लिलावधारक यांनी वाळूगटात पाणी असल्यामुळे लिलावाच्या रक्कमा शासनजमा न केल्याने जिल्हाधिकारी, नांदेड यांनी दि.३.०४.२०१८ रोजीच्या आदेशान्वये लिलावधारक श्री. बडुरे यांनी शासनजमा केलेली इसारा रक्कम रू.४,००,५२१/- जप्त करून, लिलावातील ¼ रक्कमेतील फरकाची रक्कम वसूल करून लिलावधारकाचे नाव संपुर्ण राज्यातील रेती लिलावाकरीता काळ्या यादीत टाकण्याबाबतचे आदेश पारीत केले.

सदर आदेशाविरूध्द लिलावधारक श्री. बडुरे यांनी विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांच्याकडे अपील दाखल केले असता, अपर विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी दि.३०.०१.२०१९ रोजी अपीलार्थी यांचा अर्ज नामंजूर करून जिल्हाधिकारी, नांदेड यांचे दि.३.०४.२०१८ रोजीचे आदेश कायम केले. तद्नंतर लिलावधारक श्री. बडुरे यांनी सदर आदेशाविरूध्द तत्कालीन मा. राज्यमंत्री (महसूल) यांच्याकडे अपील दाखल केले असता, तत्कालीन मा. राज्यमंत्री (महसूल) यांनी दि.९.०९.२०१९ रोजी अपर विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचे दि.३०.०१.२०१९ रोजीचे व जिल्हाधिकारी, नांदेड यांचे दि.३.०४.२०१८ रोजीचे आदेश रद्द करून वादी यांना लिलावात जमा केलेली रक्कम परत करण्याबाबतचे आदेश पारीत केले. त्याअनुषंगाने मौजे बरबडावाडी, ता. नायगांव या वाळूगटाकरीता लिलावधारक श्री. गंगाधर दिगांबर बडुरे यांची जप्त केलेली इसारा रक्कम रू.४,००,५२१/- एवढ्या रकमेचा परतावा करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

२. सबब, श्री. गंगाधर दिगांबर बडुरे यांना रक्कम रु.४,००,५२१/- (रुपये चार लाख पाचशे एकवीस फक्त) इतकी रक्कम, यापूर्वी ही रक्कम अदा केलेली नाही याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

३. या बाबीवर होणारा खर्च सन २०२१-२२ या वर्षाकरीता लेखाशिर्ष "०८५३ - अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग "१०२ - खनिजबाबत सवलत फी व स्वामित्वधन, ९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग - वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) खाली वजा परतावे देण्याकरीता करण्यात आलेल्या उपलब्ध अंदाजपत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

४. सदर शासन ज्ञापन वित्त विभागाच्या क्र.विअप्र-२०१९/प्र.क्र.२०/२०१९/विनियम, दि.०८/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-२ नुसार महसूल व वन विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२१११२४१८१४४३३६१९ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SADANAND GOVIND MOHITE

Digitally signed by SADANAND GOVIND MOHITE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9bd008875b6a3a9fddad3e55fe0328df13a27221cb2bbc67abd0155f914efc01, pseudonym=F963BC6AD59D767D7C33C1B8350D778425D54B0E, serialNumber=6590E2301450C474B246074049174C79201BCAD9E5EB15E8F21C282EAEFEDA38, cn=SADANAND GOVIND MOHITE
Date: 2021.11.24 18:17:07 +05'30'

**( स. गो. मोहिते )**
**कक्ष अधिकारी , महसूल व वन विभाग**

**प्रति,**

जिल्हाधिकारी, नांदेड.

**प्रत:**

१) विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-२ नागपूर.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड.
५) कार्यासन अधिकारी (ब-१ कार्यासन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.
६) निवडनस्ती "ख-२" कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.